दिव्यांग कल्याण विभागामध्ये महिला तक्रार निवारण समिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र.: इडीडी-२०२३/प्र.क्र.१२/दि.क.-१**

३१, ३२, ३५ए, मित्तल टॉवर, ए-विंग, तिसरा मजला,
बॅरीस्टर रजनी पटेल मार्ग, नरीमन पॉईंट,
मुंबई-४०० ०२१.
दिनांक : २५ एप्रिल, २०२३.

वाचा:- १) केंद्र शासनाचा कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवाारण) अधिनियम-२०१३, दि. २२ एप्रिल, २०१३ व नियम दि. ९ डिसेंबर, २०१३.

२) महिला व बालविकास विभाग, शासन निर्णय क्रमांक मकचौ-२०१३/प्र.क्र.६३/मकक, १९ जून, २०१४.

प्रस्तावना:-

केंद्र शासनाच्या कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवाारण) अधिनियम-२०१३ मधील तरतुदी व संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयामध्ये नमूद सुचनांच्या अनुषंगाने दिव्यांग कल्याण विभागासाठी कामाच्या ठिकाणी महिलांच्या होणाऱ्या लैंगिक छळाच्या तक्रारींची चौकशी करण्यासाठी "महिला तक्रार निवारण समिती" गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवाारण) अधिनियम-२०१३ मधील तरतुदी व महिला व बाल विकास विभाग शासन निर्णयामध्ये नमूद सुचनांच्या अनुषंगाने दिव्यांग कल्याण विभागाची खालील नमुद केल्यानुसार "महिला तक्रार निवारण समिती" गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | श्रीम. सुनंदा घड्याळे, उपसचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २. | श्री.राजेश भा. गायकवाड, अवर सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३. | श्रीम. प्रमिला कडू, सहायक कक्ष अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

सदर समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

१) केंद्र शासनाच्या कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवाारण) अधिनियम-२०१३ मधील तरतुदीनुसार महिलांच्या लैंगिक छळवणूकीस आळा घालण्यासाठी व कामाच्या ठिकाणी सुरक्षित वातावरण मिळावे याकरीता आवश्यक उपाययोजना करणे.

२) सदर तक्रार समितीकडे प्राप्त झालेल्या तक्रारींचे विहित कालावधीत निवारण करणे व तक्रारींच्या अनुषंगाने योग्य त्या प्राधिकाऱ्याकडे पुढील कार्यवाहीसाठी प्रस्ताव सादर करणे.

३) सदर अधिनियमातील तरतुदीनुसार वार्षिक अहवाल सादर करणे.

३. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४२५१७३७२६६१३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by VISHNUDAS PUNDLIKRAO GHODKE
Date: 2023.04.25 17:43:55 +05'30'

**( वि. पुं. घोडके )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. श्रीम. सुनंदा घड्याळे, उपसचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.,
२. श्री.राजेश भा. गायकवाड, अवर सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.,
३. श्रीम. प्रमिला कडू, सहायक कक्ष अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-२१.,
२. सर्व अधिकारी / कर्मचारी, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई-२१.,
३. कक्ष अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.,
४. निवड नस्ती (दि.क.-१).